**महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम १०ड अंतर्गत मुद्रांक शुल्क आकारणीची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने नॅशनल ई-गव्हर्नंन्स सर्व्हीस लि. (NeSL) या कंपनी सोबतच्या सामंजस्य करारास मुदत वाढ व करारावर (MoU) स्वाक्षरी करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- मुद्रांक-२०२१/१०२४/प्र.क्र.३२३/म-१(धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २९ एप्रिल, २०२५.

**संदर्भ**:- १) शासन अधिसूचना क्र. मुद्रांक २०१५/१०४९/प्र.क्र.३३४/म-१ दिनांक ३ जून २०१६.
२) शासन आदेश क्र.मुद्रांक -२०२१/६८/प्र.क्र.६९/म-१(धो) दि.२५/१०/२०२१.
३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. का.५/मुद्रांक-२४/प्र.क्र.०६/२०१६/८००/२०२४,दिनांक १७/१०/२०२४.
४) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, आर.आय. क्र.०५-२०२५/Con/E, dtd. २८/०२/२०२५.

**आदेश:-**

राज्यातील शासकीय विभाग, स्थानिक स्वराज्य संस्था व बँक यांचे कामाच्या संदर्भात जे दस्त होतात, त्या दस्तांना अधिनियमानुसार आवश्यक तेवढे मुद्रांक शुल्क शासनाच्या GRAS या ई-पेमेंट प्रणालीद्वारे भरले आहे का? याची खात्री करण्याची जबाबदारी या शासकीय विभाग, स्थानिक स्वराज्य संस्था व बँका यांचेवर महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमातील कलम १० ड अन्वये सोपविण्यात आली असून याबाबत शासनाने दि. ३ जून २०१६ रोजी अधिसूचना निर्गमित करून कोणत्या विभाग / संस्थांच्या कोणत्या दस्तऐवजांसाठी ही जबाबदारी लागू राहील हे निश्चित केले आहे.

त्यानुसार संदर्भ क्र.२ येथिल शासन आदेशान्वये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम १०ड अंतर्गत मुद्रांक शुल्क आकारणीची अंमलबजावणी करणेकरिता व जास्तीत जास्त बँका व वित्तीय संस्थांना या प्रणालीमध्ये समाविष्ठ करुन घेण्याकरीता National E-Governance Services Ltd. (NeSL) या कंपनीसमवेत दि. २७/१०/२०२१ पासून ३ वर्षासाठी सामंजस्य करारावर स्वाक्षरी करण्यास शासनातर्फे नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले होते. सदर कराराची मुदत दि. २६.१०.२०२४ रोजी संपुष्टात आली आहे.

National E-Governance Services Ltd. (NeSL) या संस्थेचा वित्तीय व्यवस्था स्थापित करणे हा उद्देश आहे, ज्यामध्ये कर्जदाराने दिलेल्या कर्जाचे डेटा आणि कागदपत्रे कर्जाच्या पोर्टफोलिओची सुविधा, आंतर-बाह्य बंडलिंग आणि डाउन-सेलिंगसाठी केंद्र उपलब्ध असतील. NeSL या संस्थेने आय.बी.बी.आय. च्या नियमन अंतर्गत डिजिटल डॉक्युमेंट एक्झिक्यूशन (डीडीई) प्लॅटफॉर्म तयार केला आहे. NeSL च्या सिस्टीमवर काम केल्यास ई-साइन आणि ई-स्टँप दोन्ही कार्यपद्धती सोपे आणि वेगवान होत असल्याने सदर प्रक्रिया आणि व्यवहारासाठी कमी खर्च लागतो. महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम १०ड अंतर्गत मुद्रांक शुल्क आकारणी करताना NeSL च्या माध्यमातून एकाच प्लॅटफार्मवर सर्व बँका मिळत असल्याने मुद्रांक शुल्क चुकविण्याची

शक्यता कमी आहे. जर एखाद्या बँकेने मुद्रांक शुल्क चुकविले किंवा कमी आकारले तर सर्व बँका एकाच प्लॅटफॉर्मवर उपलब्ध होत असल्याने त्याबाबत शोध घेण्यास मदत होणार आहे. NeSL च्या माध्यमातून यामध्ये अनेक बँकींग व गैरबँकींग क्षेत्रातील वित्तीय संस्थांची भर पडेल. NeSL स्वत: कर्जदाराने दिलेल्या कर्जाचा डेटा आणि कागदपत्रे कर्जाच्या पोर्टफोलिओची सुविधा, आंतर-बाह्य, बंडलिंग आणि डाउन-सेलिंगसाठी किमान शुल्क आकारून सुविधा देणार असल्याने बँकांचा वेळ वाचेल. नागरिकांना कर्ज प्रकरणासाठी घर बसल्या ऑनलाईन सुविधा प्राप्त होणार असल्यामुळे त्यांचा वेळ वाचून पैशाची बचत होणार आहे.

या सर्व बाबी लक्षात घेता, महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम १०ड अंतर्गत मुद्रांक शुल्क आकारणीची अंमलबजावणी करणेकरिता व जास्तीत जास्त बँका व वित्तीय संस्थांना या प्रणालीमध्ये समाविष्ठ करुन घेण्याकरीता शासनास NeSL या कंपनीसोबतच्या सामंजस्य करारास (M.O.U.) मुदतवाढ देणे आवश्यक आहे. यास्तव National E-Governance Services Ltd. (NeSL) या कंपनीसमवेत करावयाच्या सामंजस्य करारास पुढील ३ वर्षाकरिता मुदतवाढ देण्यास तसेच शासनातर्फे स्वाक्षरी करण्यास या आदेशान्वये नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२९१५४१४४१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2025.04.29 15:43:06 +05'30'

**(सुनिल जाधव)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ०३२.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. मा. मंत्री (महसूल) / मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
५. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई- ४०० ०३२.
६. मा. उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई- ४०० ०३२.
७. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई- ४०० ०३२.
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई- ४०० ०३२.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. अपर मुख्य सचिव, (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. प्रधान सचिव, (माहिती व तंत्रज्ञान विभाग), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१.
१४. महालेखापाल १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
१५. संचालक, नॅशनल ई- गव्हर्नन्स सर्व्हिसेस लि., बेंगळूरू, कर्नाटक- ५६००४२.
१६. संचालक, नॅशनल इन्फॉरमॅटीक्स सेंटर, पुणे- ४११ ००७.
१७. निवडनस्ती, कार्यासन (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.